राज्यातील यंत्रमाग ग्राहकांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (समायोजन) सन २०२१-२२.

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क.६१/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २५ नोव्हेंबर, २०२१

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दि.०६ एप्रिल, २०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पूरक- २०२१/प्र.क्र.७८/अर्थ-३, दि. २०जुलै, २०२१.
४) महावितरण कंपनीचे पत्र क्र. मु.अ.(वा)शासन/वीजदर सवलतीपोटी निधी/०२२२२०, दि.२१ सप्टेंबर, २०२१.

प्रस्तावना :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादितकडून वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून महावितरण कंपनीस केली जाते. महावितरणला यंत्रमाग ग्राहकांना वीज सवलतीसाठी सन २०२१-२२ करिता लेखाशिर्ष २८०१५५८१ खाली अर्थसंकल्पित केलेल्या रु. ६००.०० कोटीमधून रु.२३५.०० कोटी रक्कम दिनांक २९.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये रोखीने वितरीत करण्यात आली आहे व रु. ३५०.०० कोटीची पुरवणी मागणी जुलै, २०२१ च्या अधिवेशनात समायोनासाठी मंजूर करण्यात आली आहे. जुलै, २०२१ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये खर्चाचे पुरक विवरणपत्र विधान मंडळास सादर करण्यात आले. दिनांक ३१ मार्च, २०२२ रोजी संपणाऱ्या वित्तिय वर्षाच्या विनियोजनामध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे आणि ते, महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२१ (सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-०८) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक १५ जुलै, २०२१ यामध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे. त्यानुषंगाने सदर शासन परिपत्रकातील सुचनांनुसार समायोजनासाठी पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेली रु. ३५०.०० कोटी तरतूद ही महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीस समायोजनाने उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

यंत्रमाग ग्राहकांना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेल्या अनुदानाच्या रक्कमेपैकी रु.३५०.०० कोटी (रुपये तिनशे पन्नास कोटी फक्त) रोखीने वितरीत न करता समायोजनाने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०२) यंत्रमाग ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५८१), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाने वितरीत करावयाची रक्कम रु.३५०.०० कोटी (रुपये तिनशे पन्नास कोटी फक्त) महावितरण कंपनीस रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महावितरण कंपनी मर्या., यांच्याकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेपोटी वसूल करण्यात यावी व खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली समायोजनाव्दारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १) | वित्तीय वर्ष २०२०-२१ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (जाने, २०२१ ते मार्च, २०२१ उर्वरित) | २५७,४६,३८,४४०/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्री यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (००४३००९२) |
| २) | वित्तीय वर्ष २०२०-२१ या वर्षातील वीजेच्या विक्रीवरील करापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (जाने, २०२१ ते मार्च, २०२१ अंशत:) | ९२,५३,६१,५६०/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्री यावरील कर (०१) (०३) महाराष्ट्र विजेच्या विक्रीवरील कर (सुधारणा) अधिनियम २००४ (००४३००८३) |
| | **एकूण** | **३५०,००,००,०००/-** | |

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम रु.३५०.०० कोटी (रुपये तिनशे पन्नास कोटी फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

५. सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल, मुंबई यांच्या अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने रु.३५०.०० कोटी (रुपये तिनशे पन्नास कोटी फक्त) सदर रकमेचे देयक तयार करण्यात येवू नये.

६. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना उपरोक्त समायोजनाव्दारे वितरीत करावयाची रक्कम ही वित्त विभागाने मंजूर केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत आहे.

७. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या व वित्त विभागाचा सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२१११२५११४२०१५०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2021.11.25 11:44:02 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.

२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे मुंबई ४०००५१

३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, १३ वा मजला, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कुलाबा, मुंबई १

४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई ३२

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०

६) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

८) अधिदान व लेखा अधिकारी,रालेवि/अराप, मुंबई ४००००१

९) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय. वांद्रे पूर्व , मुंबई ४०००५१

१०) उप सचिव (ऊर्जा-५) ,उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

११) वित्त विभाग, अर्थसंकल्प-१४, व्यय-१६, मंत्रालय, मुंबई-४०००३२

१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर मुंबई.

१३) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.